**सन २०१८-१९ करीता आदिम जमातीचा विकास या राज्य योजनेंतर्गत आदिम जमातीच्या कुटुंबाकरिता घरकुल बांधण्याच्या खर्चास मान्यता देवून निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आदिम-२०१९/प्र.क्र.११/का.-१९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १५/०२/२०१९

वाचा -

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: आदिम-२०१७/प्र.क्र.१३/का-१९, दि. ०६/०२/२०१७
२) आदिवासी विकास विभाग ,शासन निर्णय क्रमांक: शघयो-२०१६/प्र.क्र.३३६/का-१७, दि. ०६/०१/२०१७

प्रस्तावना(Preamble) -

राज्यातील कातकरी , माडिया गोंड व कोलाम या जमाती आदिम जमाती (Particularly Vulnerable Tribes) म्हणून केंद्रशासनाने अधिसूचित केलेल्या आहेत. या जमाती अतिशय दुर्गम व डोंगराळ भागात वस्ती करुन राहतात. यामुळे या जमातींचा निवासाचा प्रश्न सोडविण्यास प्राधान्य देऊन चालू वर्षी आदिम जमातीचा विकास कार्यक्रम अंतर्गत रू.१६००.०० लक्ष अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. आदिम जमातीचा विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या घरकुलांची योजना शबरी आदिवासी घरकुल योजनेच्या धर्तीवर राबविण्याबाबत संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये घरकुलांच्या किंमतीची निश्चिती करण्यात आलेली आहे. यानुसार सन २०१८-१९ करीता उपलब्ध निधीतून घरकुल बांधण्याकरीता लक्षांक निश्चित करण्याची व त्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** (Government resolution)-

शासन आता या निर्णयाद्वारे आदिम जमातीचा विकासासाठी राज्य योजनेअंतर्गत आदिम जमातीचा विकास याखाली सन २०१८-१९ या वर्षात रू.१६००.०० लक्ष अर्थसंकल्पीत तरतुदीतून शबरी घरकुल योजनेच्या धर्तीवर आदिम जमातीच्या कुटुंबासाठी ११६८ घरकुले शौचालय बांधकामासह (सपाट प्रदेशासाठी प्रति घरकुल रु. १.३२ लक्ष व डोंगरी व नक्षलप्रवण क्षेत्राकरीता प्रति घरकुल रु.१.४२ लक्ष प्रमाणे) बांधकाम करण्याच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर घरकुल बांधकाम करण्याची योजना ग्रामविकास विभाग अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण मार्फत राबविण्यात यावी. यासाठी पात्र लाभार्थ्यांची यादी ही त्या त्या जिल्ह्याचे संबधित प्रकल्प अधिकारी , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडून राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. या योजनेखाली जिल्हानिहाय

/अनुसूचीत जमातीनिहाय घरकुलांचे उद्दीष्ट व प्रस्तावित निधी वितरणाचा लक्षांक खालील तालिकेत नमूद केल्याप्रमाणे राहील.

| अ.क्र. | जिल्हा | घरकुलाचा लक्षांक | प्रति घरकूल निधी | घरकुलाकरीता प्राप्त होणारा निधी (रु. हजारात) |
|---|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | ७७ | १.४२ | १०९.३४ |
| २ | नागपूर | ११७ | १.३२ | १५४.४४ |
| ३ | चंद्रपूर | १२३ | १.३२ | १६२.३६ |
| ४ | यवतमाळ | ३२७ | १.३२ | ४३१.६४ |
| ५ | ठाणे | १२४ | १.४२ | १७५.४३ |
| ६ | पालघर | ८९ | १.४२ | १२७.०३ |
| ७ | रायगड | २८५ | १.४२ | ४०४.७० |
| ८ | वर्धा | २६ | १.३२ | ३४.३२ |
| | **एकुण** | ११६८ | | १५९९.२६ |

**(टिप:- उपरोक्त प्रमाणे लक्षांकांमध्ये स्थानिक स्तरावर सपाट व डोंगरी भागाचे निकष लक्षात घेवून प्राप्त निधीच्या मर्यादेत लक्षांकामध्ये बदल करण्याचे अधिकार संबधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना राहतील. तसेच उक्त लक्षांकाव्यतिरीक्त अतिरीक्त घरकुलांची मागणी असल्यास त्याप्रमाणे उद्दीष्ट वाढवून निधीची मागणी शासनाकडे करावी.)**

२. या योजनेखाली वितरीत करण्यात येणारा रु. १६००.०० लक्ष इतका निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे मार्फत राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण कडे तात्काळ वर्ग करण्यात यावा.

३. उपरोक्त रु. १६००.०० लक्षचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०१ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४९) आदिम जमातीचे विकासासाठी केंद्रीय क्षेत्र योजना, ३१ सहायक अनुदाने (२२२५ c ८८५) (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित झालेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

४. सदरची तरतूद अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी.

५. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१५१५५९०६५८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Shivaji Jadhav

Digitally signed by Santosh Shivaji Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f635bf4a671627c02b82e6a01acb4a38afc24f58a5534a9d1271fe258a564b0, serialNumber=b8ee819ccc335cea98640b72c63671dd013899d3601f09ce4ea340e1741652a0, cn=Santosh Shivaji Jadhav
Date: 2019.02.15 16:00:58 +05'30'

**( संतोष जाधव )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. राज्य संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- ग्रामिण गृह निर्माण, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
९. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सहसचिव/उप सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.